असुधारित वेतनश्रेणीत वेतन घेणा-या राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचा-यांच्या महागाई भत्त्याच्या दरात दि.१जुलै, २००९ पासून वाढ करण्याबाबत ...

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
शासन निर्णय - क्रमांक: मभवा-११०९/प्र.क्र.९६/सेवा-९
दिनांक २ डिसेंबर, २००९.
संदर्भ :- शासन निर्णय समक्रमांक दि.२१ जुलै, २००९.

महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ अन्वये राज्य शासकीय कर्मचा-यांना दि.१/१/२००६ पासून सुधारित वेतन संरचना लागू करण्यात आलेली आहे. तथापि, जे राज्य शासकीय कर्मचारी व महागाई भत्ता अनुज्ञेय असणारे इतर सर्व पात्र पूर्णकालीक कर्मचारी अद्यापही असुधारित वेतनश्रेणीत वेतन घेत आहेत, त्यांना महागाई भत्ता वाढ मंजूर करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन असे आदेश देत आहे की, जे राज्य शासकीय कर्मचारी व महागाई भत्ता अनुज्ञेय असणारे इतर सर्व पात्र पूर्णकालीक कर्मचारी अद्यापही असुधारित वेतनश्रेणीत वेतन घेत आहेत, त्यांचे असुधारित वेतनश्रेणीतील मूळ वेतन अधिक महागाई वेतन यावरील अनुज्ञेय महागाई भत्त्याचा दर दिनांक १ जुलै, २००९ पासून ६४% वरून ७३% टक्के करण्यात यावा. सदर महागाई भत्त्याची वाढ रोखीने देण्यात यावी.

३. महागाई भत्त्याची रक्कम प्रदान करण्यासंदर्भात विद्यमान तरतुदी व कार्यपद्धती आहे त्याचप्रकारे यापुढे लागू राहील.

४. यावर होणारा खर्च संबंधित शासकीय कर्मचा-याचे वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात, त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. अनुदानप्राप्त संस्था, नगरपालिका व जिल्हा परिषदा यांच्या कर्मचा-यांचा बाबतीत, संबंधित प्रमुख लेखाशीर्षाखालील ज्या उप लेखाशीर्षाखाली त्यांच्या सहाय्यक अनुदानाबाबतचा खर्च खर्ची टाकण्यात येतो, त्या उप लेखाशीर्षाखाली हा खर्च खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २००९१२०२१२०९२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि. म. म्हात्रे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.

मंत्रालयीन सर्व विभाग
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख.
# प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
# प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
# प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
#आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
# सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
#प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा
महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड. पुणे
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई /पुणे/ नागपूर/ औरंगाबाद /नाशिक/ अमरावती.
राज्य महिला आयोग, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती
कुलसचिव, श्रीमती नाथाबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-९)

# पत्राने